भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांच्या आस्थापनेवरील गट-अ आणि गट-ब (राजपत्रित) अधिकाऱ्यांच्या बदलीने पदस्थाना देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग
### शासन आदेश क्रमांकः एमएनए-०५२५/प्र.क्र.२६ उ-९

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ३० मे, २०२५

<u>**संदर्भ:**</u> महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अध्यादेश, २००५

## <u>शासन आदेश</u>

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकिय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालयातील गट-अ व गट-ब (राजपत्रित) खालील तक्त्यात नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व संवर्ग | सध्याचे कार्यरत ठिकाण | बदलीने दिलेली पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. सु. श्री. नैताम, वरिष्ठ भूवैज्ञानिक | जिल्हाधिकारी कार्यालय, चंद्रपूर | प्रमुख कार्यालय, नागपूर |
| २. | श्रीम. प्र. रा. चापले, भूवैज्ञानिक | जिल्हाधिकारी कार्यालय, अकोला | जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती (श्री. शेख इम्रान यांच्या पदस्थापनेबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येईल.) |
| ३. | श्री.वि.ता.धांडे, भूवैज्ञानिक | प्रमुख कार्यालय, नागपूर | जिल्हाधिकारी कार्यालय, अकोला |
| ४. | श्रीम. नि. य. जाधव, कनिष्ठ भूवैज्ञानिक | प्रादेशिक कार्यालय, कोल्हापूर | जिल्हाधिकारी कार्यालय, सोलापूर |

| | | | |
|---|---|---|---|
| ५. | श्रीम.दि.स.वर्मा, कनिष्ठ भूवैज्ञानिक | जिल्हाधिकारी कार्यालय, सोलापूर | जिल्हाधिकारी कार्यालय, अहिल्यानगर |
| ६. | श्री. मि.ना.माने, कनिष्ठ भूवैज्ञानिक | प्रादेशिक कार्यालय, कोल्हापूर | जिल्हाधिकारी कार्यालय, सातारा |
| ७. | श्री.आ. गु. पाटील, कनिष्ठ भूवैज्ञानिक | जिल्हाधिकारी कार्यालय, कोल्हापूर | जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे (श्री.सुयोग जगताप यांच्या पदस्थापनेबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येईल.) |
| ८. | श्री.दि. लि. चव्हाण, कनिष्ठ भूवैज्ञानिक | जिल्हाधिकारी कार्यालय, नंदुरबार | जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक |
| ९. | श्री.कि.सा.घोडके, कनिष्ठ भूवैज्ञानिक | जिल्हाधिकारी कार्यालय, छत्रपती संभाजीनगर | प्रादेशिक कार्यालय, कोल्हापूर |
| १०. | श्रीम. रो. शि. चव्हाण, कनिष्ठ भूवैज्ञानिक | जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक | जिल्हाधिकारी कार्यालय, नंदुरबार |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. उपरोक्त नमूद अधिकाऱ्यांना बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी ते धारण करत असलेल्या पदावरुन या आदेशान्वये शासन स्तरावरुन एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. संबंधित अधिकाऱ्यांनी बदलीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे व त्याबाबतचा अनुपालन अहवाल संबंधितांनी शासनास तसेच महासंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांना सादर करावा.

३. सदर आदेश हेच कार्यमुक्तीचे आदेश असून भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांनी नव्याने आदेश काढण्याची आवश्यकता नाही. संबंधित अधिकारी बदलीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास त्वरित कळवावे.

४. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयत्तेर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतुदीनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापुर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१६/का.१४, दि.२३.१२.२०१६ मधील तरतुदीनुसार **शिस्तभंगविषयक कारवाई** करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास, त्यांच्या **अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन** (dies non) म्हणून गणला जाईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. संबंधित अधिकारी बदलीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी विहित कालावधीत रुजू न झाल्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने सदर अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्वीकारू नयेत, असे अर्ज प्राप्त झाल्यास ते सदर अधिकाऱ्याच्या मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

७. सदरहू आदेशानुसार बदलीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी व गैरवर्तणूक समजून त्यांचे विरूद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५३०१६१४१००३१० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

LAXMIKANT
GOPALRAO DHOKE

Digitally signed by LAXMIKANT GOPALRAO DHOKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E714BBCD4D43C6782884C7E7A2091F9F1EDC1D97EBB542C48B98FB8C8BDD6CF4, cn=LAXMIKANT GOPALRAO DHOKE
Date: 2025.05.30 16:14:53 +05'30'

**(लक्ष्मीकांत ढोके)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (खनिकर्म) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा.राज्यमंत्री (खनिकर्म) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-३२
३. अ.मु.स. (खनिकर्म), यांचे स्वीय सहायक, उ. ऊ. का. व ख. विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
४. महासंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
५. सह सचिव (खनिकर्म), यांचे स्वीय सहायक, उ. ऊ. का. व ख. विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
६. संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
७. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई.
८. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२ नागपूर.
९. जिल्हाधिकारी अमरावती, अकोला, सोलापूर, अहिल्यानगर, सातारा, पुणे, नाशिक व नंदुरबार
१०.सर्व उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय.
११. जिल्हा खनिकर्म अधिकारी (संबंधित), भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
१३. निवडनस्ती:- उद्योग-९